**निलंगा पंचायत समिती (जि.लातूर) प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी फर्निचर व उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१७/प्र.क्र. २७६ /बांध-४**
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २० जुन,२०१८

वाचा -

१) **शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्रमांकः पंसई-२०११/प्र.क्र.५३/पंरा-७, दि.१८.०६.२०१२**
२) **शासन निर्णय ग्रामविकास विभाग क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र.१५७/पंरा-७, दि.२४.०८.२०१६**
३) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, लातूर यांचे पत्र क्र. जिपना/ बांध/कार्या-०१/ सीआर-२९/कावि-१५७/२०१८, दि. १७.०२.२०१८**

प्रस्तावना :-

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी वरील संदर्भीय पत्रान्वये निलंगा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी फर्निचर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. निलंगा (जि. लातूर) पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामास दिनांक १८.०६.२०१२ च्या शासन निर्णयान्वये रु. ३५१.४१ लक्ष इतक्या रकमेची व दिनांक २४.०८.२०१६ च्या शासन निर्यियान्वये रु. ४९०.५८ लक्ष इतक्या रकमेची सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली असून त्यानुसार निधी जिल्हा परिषदेला वितरीत करण्यात आलेला आहे. निलंगा पंचायत समितीच्या इमारतीचे बांधकाम पुर्ण झाले असून त्यामध्ये दैनंदीन कामकाज सुरु करण्याच्या दृष्टीने फर्निचरची नितांत आवश्यकता आहे. सदरहु पंचायत समितीकरीता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम मंजूर करतेवेळी

अंदाजपत्रकामध्ये अंतर्भुत नसलेल्या फर्निचर करण्याकरीता अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी रु. १५०.१८ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. याकरीता सन २०१७-१८ ची दरसूची विचारात घेण्यात आली आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी प्रस्तावासोबत प्रस्तावित कामाचे बाब निहाय सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे.

३. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती निलंगा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी फर्निचर कामांस प्रशासकीय मान्यता देण्याच्या रुपये १५०.१८ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

निलंगा (जि. लातूर) पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी फर्निचर कामांस एकूण रक्कम रुपये १,५०,१८,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पंन्नास लक्ष अठरा हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) निलंगा पंचायत समितीच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

२. निलंगा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी फर्निचर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENERAL ABSTRACT FOR NILANGA P.S. BLDG., FURNITURE | | |
|---|---|---|
| Sr. No | Description of item | Amount (in Rs.) |
| १ | Furniture | १०९८८५३७.०० |
| २ | Contingencies ४ % | ४३९५४१.४८ |
| ३ | Escalation and increase in DSR | १०९८८५३.७० |
| ४ | Sound System | २०००००.०० |
| ५ | Add for GST १८ % | २२९०८४७.७९ |
| | TOTAL | १५०१७७७९.९७ |
| | Say Rs. | १५०१८०००.०० |

३. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च "**२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१,** पंचायती राज **३१** सहाय्यक अनुदाने **(०१) (०३)** जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने **(२५१५ ००५३) "** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, **१९७८,** भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.**१** महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.**१३४**

खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२०१८४८१५७१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2018.06.22 15:50:50 +05'30'

**( दि.बा पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
४. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद लातूर
६. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद लातूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा लातूर
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
९. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१०. जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा लातूर
११. सभापती, पंचायत समिती, निलंगा, जिल्हा लातूर
१२. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, निलंगा, जिल्हा लातूर
१३. निवडनस्ती-बांधकाम-४, ग्रा.वि.वि. बांधकाम भवन फोर्ट मुंबई-४०० ००१